संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत. (२२३५११४७) (२२३५ ३०४१)

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.बीजीटी- २०१८/प्र.क्र.९८/का-८,**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,GR
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३० ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ**

१) वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं/२०१८ प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय बालगृ- २०१८/प्र.क्र.१६/का-८,दि..२६.२.२०१८ .

**प्रस्तावना :**

१. वित्त विभागाच्या दि. ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीपैकी ७० टक्के इतका निधी खर्चासाठी उपलब्ध आहे.

२. बाल न्याय ( मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५, मधील तरतुदीनुसार काळजी व संरक्षणाची गरज असलेल्या बालकांच्या पुनर्वसन व पुनर्स्थापनेच्या उद्देशाने निवासी व इतर अत्यावश्यक सेवासुविधा पुरविण्यासाठी स्वयंसेवी संस्थाना बालगृह चालविण्यास शासनाची मान्यता देण्यात येते. अशी अनुदानित मान्यता असलेल्या स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देणेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात, -संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान', लेखाशिर्ष (२२३५ ३०४१), ३१,सहायक अनुदान (वेतनेत्तर), आणि -निराश्रित बालकांसाठी संस्थेतर सेवा' (२२३५ ११४७), ३१, सहायक अनुदान अंतर्गत अर्थसंकल्पित निधीच्या ७० टक्केच्या प्रमाणात उपलब्ध होत असलेला निधी आणि लेखाशिर्ष (२२३५ ३०४१), ३६ सहायक अनुदान (वेतन) अंतर्गत वित्त विभागाने वितरणास सहमती दिलेला निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. आता या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे निधी वितरणास मान्यता देत आहे :-

| अ.क्र. | योजना व लेखाशिर्ष व उद्दिष्ट्य | सन २०१८-१९ अर्थसंकल्पित तरतूद (रू. लक्ष) | वितरित करण्यात येत असलेला निधी. (रू. लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांनी सहायक अनुदान (२२३५ ३०४१) | | |
| | ३१,सहायक अनुदान (वेतनेत्तर ) | ११९५.७० | ८३६.९९ |
| | ३६, सहायक अनुदान (वेतन) | ९३०.०६ | २९१.०१ |
| | एकूण | **२१२५.७६** | **११२८.००** |
| २ | निराश्रित बालकांसाठी संस्थेतर सेवा (२२३५ ११४७)३१ ,सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ३४८४.७३ | २४३९.३१ |

२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बालकल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना , (०५) निराश्रित बालकांसाठी संस्थेत्तर सेवा (०५) (०२) निराश्रित बालकांसाठी संस्थेत्तर सेवा (२२३५ ११४७), कार्यक्रम, ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली आणि मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बालकल्याण, (०२), स्वयंसेवी संस्थांना अनुदान ,(०२)(०३) संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान (२२३५ ३०४१), अनिर्वाय, ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) आणि ३६, सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावा.

३. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियमाच्या तरतूदींच्या अनुषंगाने ,बालकांस बालगृहात प्रवेश देणेबाबत निर्णय घेताना,संबंधित बालकास कुटुंबात राहण्यास प्राधान्य देण्यात यावे आणि अनाथ , निराधार अशा आत्यंतिक गरजू प्रवेशितांनाच बालगृहात दाखल करण्यात यावे.

४. ज्या स्वयंसेवी संस्थांमध्ये बाल कल्याण समितीच्या आदेशान्वये काळजी व संरक्षणासाठी बालके दाखल करण्यात आलेली आहेत, अशाच अनुदानित स्वयंसेवी संस्थांना दाखल प्रवेशितांच्या प्रमाणात सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी उक्त लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध केलेला निधी संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णय दि. २६.०२.२०१८ च्या दराने आणि अटी व शर्तीच्या अधीन वितरित करण्यात यावा.

५. सदरचा निधी स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी प्राधान्याने खर्च करणे व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी. तसेच वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे आणि संदर्भाधीन परिपत्रकातील सर्व अटी/शर्तींचे पालन करावे.

६. सदर शासन निर्णयान्वये ३१, सहायक अनुदानांतर्गत वितरित करण्यात येत असलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करताना उपयोगिता प्रमाणपत्रासह सोबतच्या प्रपत्र-अ च्या विहीत नमुन्यात माहिती सादर करण्यात यावी. याप्रमाणे माहिती सादर न झाल्यास उपयोगिता प्रमाणपत्र ग्राह्य धरण्यात येणार नाही आणि त्यासाठी संबंधितांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल. उपयोगिता प्रमाणपत्रात नमुद खर्चाची आकडेवारी आणि उपयोगिता प्रमाणपत्रासह जोडण्यात येणा-या विवरणपत्रातील आकडेवारी सारखी असणे आवश्यक राहील.

७. सदर प्रयोजनाकरिता आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकात नमुद तपासणी सूची व विभागास लागू होणा-या बाबींची पूर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावरून निधी वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे. लेखाशिर्ष (२२३५ ३०४१), ३६ सहायक अनुदान अंतर्गतचा निधी वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२७/व्यय-६, दि. ३०.१०.२०१८च्या सहमतीने वितरित करण्यात येत आहे.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संकेतांक क्रमांक २०१८१०३१११०७००८८३० असा आहे.सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Rangrao Waghmode

Digitally signed by Shrikant Rangrao Waghmode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Woman and Child Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d6290e8e870a1c46cd16d3903f765faf7b03d01646947b584aa89c266409a04, cn=Shrikant Rangrao Waghmode
Date: 2018.10.31 11:14:29 +05'30'

**(श्रीकांत वाघमोडे)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई .
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
४) मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद,महाराष्ट्र विधीमंडळ.
६) मा.मंत्री (म व बा वि)/ राज्यमंत्री(म व बा वि),यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई .
७) सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
८) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९) आयुक्त , महिला व बाल विकास आयुक्तालय,म.रा. पुणे.
१०) महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
११) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
१२) सर्व उपसचिव ,सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास. नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
१३) उपायुक्त (बालविकास) महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
१४) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/अर्थसंकल्प-७) मंत्रालय, मुंबई -३२
१५) सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
१६) निवड नस्ती का-८.

शासन निर्णय क्र.बीजीटी- २०१८/प्र.क्र.९८/का-८,दि.३०.१०.२०१८ सोबतचे

(प्रपत्र - अ)

| अ क्र. | स्वयंसेवी संस्थेचे नाव (मंजूर प्रवेशित क्षमता) | बाल न्याय अधिनियमांतर्गत नोंदणी प्रमाणपत्राचा क्रमांक व दिनांक (मान्यता आदेश क्र व दिनांक) | जिल्हा तपासणी समितीने संस्थेची तपासणी केली त्याचा दिनांक (आर्थिक वर्षात जिल्हा तपासणी समितीने जेव्हा जेव्हा तपासणी केली तेव्हाचा दिनांक | संस्थेत दाखल प्रवेशित संख्या (ज्या ज्या दिवशी जिल्हा तपासणी समितीने तपासणी केली त्या त्या दिवसाची उपस्थिती) | बालगृहाकडून Trach Child Portal वर माहिती भरली जाते/ अद्यावयात केली जाते. (हो/ नाही.) | बालगृहा- मध्ये बायोमेट्रिक यंत्रणा कार्यान्वित (आहे/नाही) | ज्या दराने अनुदान निश्चित केले तो दर व ग्राह्य सरासरी उपस्थिती | संस्थेस वितरित केलेले अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |
| | | | | | | | एकूण* | |

*उपयोगिता प्रमाणपत्रामध्ये नमुद खर्चाचा आकडा.

(सर्व रकान्यातील माहिती संस्थानिहाय आवश्यक.)